**विधि व न्याय विभागांतर्गत संगणकीकरण प्रकल्प अंमलबजावणी समिती (PIC) गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.पीआयसी -२०१९/प्र.क्र. ५० /का. ०७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : १२ मार्च, २०२०.**

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीओएम -१००१/प्र.क्र. १७४/०१/३९, दिनांक २९ ऑक्टोबर, २००१.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. मातंस-२०११/प्र.क्र. १२५/३९, दिनांक २३ सप्टेबर, २०११.
३) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र. सीएचसी १०१०/७५७/(प्र.क्र.१३०/१०)/ का-१७, दिनांक ३ मार्च, २०१२.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २९.१०.२००१ व दिनांक २३.०९.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय कामकाजाचे संपूर्ण संगणकीकरण करण्यासाठीची कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार संगणकीकरणाचे प्रकल्प राबविण्यासाठी संबंधित विभागांनी संबंधित प्रधान सचिव/ सचिवांच्या अध्यक्षतेखाली अथवा सचिवांनी निर्देशित केलेल्या सचिव दर्जाच्या अधिकाऱ्याच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्याची तरतूद करण्यात आली आहे. त्यानुसार विभागाच्या दिनांक ३ मार्च, २०१२ रोजीच्या शासन निर्णयान्वये धर्मादाय आयुक्त संघटनेच्या संगणकीकरणाकरिता प्रकल्प अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात आली होती. तथापि सदर शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संगणकीकरणाचे दृष्टीने या विभागाचे व क्षेत्रिय कार्यालयाचे संगणकीकरण प्रकल्प राबविण्यासाठी या विभागाच्या प्रधान सचिव यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प अंमलबजावणी समिती ( Project Implementation Committee, PIC ) गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. | : अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई. | : सदस्य |
| ३. | प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. | : सदस्य |
| ४. | प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | : सदस्य |
| ५. | प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई | : सदस्य |
| ६. | संबंधित क्षेत्रिय कार्यालय प्रमुख. | : सदस्य |
| ७. | सह सचिव/उप सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. | : सदस्य सचिव |

२. या समितीस संगणकीकरणाची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक ते हार्डवेअर/ सॉफ्टवेअर सल्लागाराची निवड व इतर अनुषंगीक बाबी याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार असतील.

३. सदर शासन निर्णयानुसार गठीत करण्यात आलेल्या समितीने मान्यता दिल्यानंतर संगणक व तद्नुषंगीत बाबीचा यंत्र सामुग्रीची खरेदी शासनाने विहित केलेल्या पध्दतीनुसार करण्यात यावी.

४. कोणत्याही प्रस्तावास मान्यता देण्याबाबत समितीची एकवाक्यता न झाल्यास उच्चाधिकार समितीची मान्यता घेण्यात यावी.

५. या शासन निर्णयान्वये विभागाचा दिनांक ३ मार्च, २०१२ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१३१११८४२८४१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Virsen Jiwane

Digitally signed by Nitin Virsen Jiwane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, serialNumber=38da45fc182de9210d4220cd41371018a4d6f00892e5d1478cba8413afb06c03, cn=Nitin Virsen Jiwane
Date: 2020.03.13 11:23:06 +05'30'

**( नितीन वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (विधि व न्याय ) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव व विधि परामर्शी यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, (लेखा व कोषागारे ), वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व कक्ष अधिकारी/अधिक्षक, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती.